राष्ट्रीय सेवा योजना

सन २०१४-१५ या वर्षासाठी स्वयंनिर्वाहित रासेयो

विद्यापीठनिहाय विद्यार्थी संख्या मंजूर करण्याबाबत

महाराष्ट्र शासन

उच्च व तंत्र शिक्षण विभाग

शासन निर्णय क्रमांकः रासेयो २०१४/प्र.क्र. ७५ /१४/साशि-७

मंत्रालय कक्ष, एलफिन्स्टन तंत्र विद्यालय परिसर,

मुंबई ४०० ००१.

तारीख: २७ ऑगस्ट,२०१४

वाचा :

१) भारत सरकार, युवा कार्य व क्रिडा विभाग मंत्रालय, राष्ट्रीय सेवा योजना यांचे एफ.क्र.१४/२/एन.एस.एस./आर.सी./२०१४-१५४/१७६ चे दिनांक ७ जुलै,२०१४ चे पत्र.

२) शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण -२०१०/(१३२/२०१०)/साशि-७,मंत्रालय,मुंबई ४०० ०३२, दिनांक ९ डिसेंबर,२०१०

प्रस्तावना :

राष्ट्रीय सेवा योजना ही केंद्र शासन पुरस्कृत योजना असून या योजनेअंतर्गत नियमित कार्यक्रम आणि विशेष शिबीर या दोन उपक्रमासाठी विद्यापीठ/संस्थांना दरवर्षी केंद्र शासनातर्फे विद्यार्थी संख्या मंजूर करण्यात येते. तथापि, सन २०१४-१५ या वर्षाकरिता संदर्भाधिन पत्रान्वये केंद्र शासनाने विद्यार्थी संख्येचे वाटप ३,१८,१०० अनुदानित आणि स्वयंनिर्वाहित एकक १८,१०० इतकी विद्यार्थी संख्या महाराष्ट्र राज्याकरिता मंजूर केली असल्याने विद्यापीठ संस्थानिहाय वाटप करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

शासन निर्णय :

उपरोक्त प्रस्तावनेत नमूद केल्याप्रमाणे राष्ट्रीय सेवा योजनेसाठी सन २०१४-१५ च्या विद्यार्थी संख्या मंजूरीबाबत नियमित कार्यक्रमासाठी ३१,८०० व विशेष शिबीर कार्यक्रमांसाठी १५,९००

अशी विद्यार्थी संख्या मान्य करण्यात आली असून प्रवर्गनिहाय म्हणजेच अनु.जातीसाठी ३,७५२, अनुसुचित जमातीसाठी २,९८९ व इतरांसाठी २५,०५९ अशी एकूण नियमित कार्यक्रमासाठी ३१,८०० व विशेष शिबिर कार्यक्रमांसाठी १५,९०० अशी विद्यार्थी संख्या मान्य करण्यात आली असून विद्यापीठ व संस्थानिहाय खालील प्रपत्रात दर्शविल्याप्रमाणे वाटप करण्यात येत आहे.

| अ.क्र. | विद्यापीठाचे नाव | नियमित कार्यक्रम (स्वयंसेवक संख्या) प्रवर्गनिहाय | | | | विशेष शिबिर स्वयंसेवक संख्या |
|---|---|---|---|---|---|---|
| | | एकूण | अनु.जाती | अनु.जमाती | इतर | |
| १) | सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे | ५,००० | ६१४ | ४८८ | ३,८९८ | २,५०० |
| २) | मुंबई विद्यापीठ, मुंबई | ५,००० | ५९० | ४७० | ३,९४० | २,५०० |
| ३) | राष्ट्रसंत तुकडोजी महाराज नागपूर विद्यापीठ,नागपूर | ३,७०० | ४१३ | ३२९ | २,९५८ | १,८५० |
| ४) | डॉ.बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, औरंगाबाद. | ३,५०० | ४१३ | ३२९ | २,७५८ | १,७५० |
| ५) | शिवाजी विद्यापीठ, कोल्हापूर | ३१५० | ३७२ | २९६ | २,४८२ | १,५७५ |
| ६) | स्वामी रामानंद तीर्थ मराठवाडा विद्यापीठ नांदेड | १,५०० | १७७ | १४१ | १,१८२ | ७५० |
| ७) | उत्तर महाराष्ट्र विद्यापीठ, जळगाव | १,४०० | १६५ | १३२ | १,१०३ | ७०० |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ८) | संचालक, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण, मुंबई | १,००० | ११८ | ९४ | ७८८ | ५०० |
| ९) | सोलापूर विद्यापीठ, सोलापूर | १,००० | ११८ | ९४ | ७८८ | ५०० |
| १०) | भारती विद्यापीठ विश्वविद्यालय, पुणे | ३०० | ३५ | २८ | २३७ | १५० |
| ११) | संचालक, शालेय शिक्षण (+ २ स्तर) | १,९५० | २३० | १८३ | १,५३७ | ९७५ |
| १२) | संत गाडगेबाबा अमरावती विद्यापीठ, अमरावती. | २,५०० | २९५ | २३५ | १,९७० | १,२५० |
| १३) | S.N.D.T., मुंबई | १,००० | ११८ | ९४ | ७८८ | ५०० |
| १४) | महाराष्ट्र आरोग्य विज्ञान विद्यापीठ, नाशिक | ४०० | ४७ | ३८ | ३१५ | २०० |
| १५) | गोंडवाना विद्यापीठ गडचिरोली | ४०० | ४७ | ३८ | ३१५ | २०० |
| | एकूण | ३१,८०० | ३,७५२ | २,९८९ | २५,०५९ | १५,९०० |

तथापि , वरील विद्यार्थी संख्या स्वयंनिर्वाहित एकक अंतर्गत असल्यामुळे या विद्यार्थी संख्येस केंद्र शासन अथवा राज्य शासन यांच्याकडून कोणत्याही प्रकारचे अनुदान प्राप्त होणार नाही. या संदर्भात राज्य शासनाचा शासन निर्णय क्रमांक : संकीर्ण -२०१०/(१३२/२०१०)/साशि-७,मंत्रालय, मुंबई ४०००३२, दिनांक ९ डिसेंबर,२०१० या शासन निर्णयाचा आधार घ्यावा. या विद्यार्थी संख्येसाठी विद्यापीठांकडे जमा होणाऱ्या शुल्कातून विद्यापीठांनी आपल्या स्तरावर अनुदानाचे वाटप करावयाचे आहे. (राज्य शासन किंवा केंद्र शासनाकडून अनुदान प्राप्त होणार नाही) विद्यापीठांनी वर्षअखेरीस स्वयंनिर्वाहित एककाचे स्वतंत्र लेखे शासनास सादर करावे.

विद्यापीठ/संस्थांनी वरीलप्रमाणे रा.से.यो. विद्यापीठनिहाय, प्रवर्गनिहाय मंजूर केलेल्या संख्येपेक्षा जास्त विद्यार्थी संख्या या योजनेखाली नोंदवून घेवू नये. तसेच सन २०१४-१५ या वर्षासाठी प्रवर्गनिहाय विद्यार्थी संख्येनुसार संबंधितांना वाटप करावे.

प्रत्येक विद्यापीठ/संस्थांनी त्यांना वाटप केलेल्या विद्यार्थी संख्येचे त्यांना संलग्न असलेल्या सर्व महाविद्यालयांना प्रवर्गनिहाय वाटप करुन त्याची प्रत शासनास पाठवावी. विद्यापीठांनी प्रत्यक्षात नोंदविलेल्या विद्यार्थ्यांची संख्या दिनांक ३० सप्टेंबर,२०१४ पर्यंत कळवावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२८१४०१०८३८०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Atul Hansra Salunkhe

Digitally signed by Atul Hansra Salunkhe
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Higher & Technical Education, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Atul Hansra Salunkhe
Date: 2014.08.28 13:58:14 +05'30'

( डॉ. अतुल साळुंके )
राज्य संपर्क अधिकारी/ विशेष कार्य अधिकारी

प्रत,

१) उप सचिव, भारत सरकार, युवा कार्य व क्रिडा विभाग, मंत्रालय, शास्त्री भवन, नवी दिल्ली.

२) सहाय्यक कार्यक्रम सल्लागार, राष्ट्रीय सेवा योजना, विभागीय केंद्र, पुणे.

३)कुलसचिव, सर्व विद्यापीठे,

४)संचालक, उच्च शिक्षण, पुणे

५)संचालक, शालेय शिक्षण (+२ स्तर ), पुणे

६) संचालक (प्रशिक्षण), व्यवसाय व प्रशिक्षण संचालनालय, मुंबई

७) कार्यक्रम समन्वयक, राष्ट्रीय सेवा योजना, सर्व विद्यापीठे,

८)नियोजन विभाग (का.१४७१)

९) वित्त विभाग (व्यय-५)

१०) वित्त विभाग (अर्थसंकल्प-८)

११) उ.व तं.शि.वि.क.अ.(अर्थसंकल्प)

१२) निवडनस्ती,साशि-७